**औरंगाबाद जिल्हा “पर्यटन जिल्हा” म्हणून घोषित करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टीडीसी-२०१४/१/प्र.क्र.६०/पर्यटन**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १७ एप्रिल, २०१५.

वाचा :-

**१) महाव्यवस्थापक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, यांचे पत्र क्र.मपविम/विकास/पर्यटन जिल्हा/४/प्र.क्र.९/२०१४, दि. १२/२/२०१४.**

**प्रस्तावना :-**

प्राचीन काळापासून औरंगाबाद परिसर हा विविध सांस्कृतिक, नैसर्गिक बाबींनी नटलेला परिसर आहे. पर्यटनाच्या दृष्टीकोनातून सर्वसाधारणत: १९१९ मध्ये अजिंठा लेण्यांचा शोध लागल्याने तेथे पर्यटनाच्या प्रगतीला सुरुवात झालेली आहे. या जिल्हयात तेव्हा पासून ते आतापर्यंत पर्यटनात सातत्याने वाढ होत आहे. युनेस्कोने घोषित केलेली औरंगाबाद जिल्हयात अजिंठा व वेरुळ अशी दोन जागतिक वारसा (World Heritage Site) स्थळे आहेत. इतर अनेक ऐतिहासिक वास्तु व स्मारके आहेत. औरंगाबाद जिल्हयातील पर्यटन क्षमता, अस्तित्वात असलेली पर्यटनस्थळे, ऐतिहासिक वास्तु, स्मारके विचारात घेता औरंगाबाद जिल्हयास “पर्यटन जिल्हा” म्हणुन घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. या शासन निर्णयान्वये औरंगाबाद जिल्हयातील पर्यटन क्षमता, अस्तित्वात असलेली वारसास्थळे, पर्यटनस्थळे, ऐतिहासिक वास्तु, स्मारके इत्यादी विचारात घेऊन औरंगाबाद जिल्हयास “पर्यटन जिल्हा” म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

२. औरंगाबाद जिल्हा “पर्यटन जिल्हा” म्हणून घोषित केल्यानंतर औरंगाबाद जिल्हयातील पर्यटनाचा विकास होण्यासाठी विविध बाबींच्या संदर्भात शासनाच्या संबंधित विभागांकडून कार्यवाही होणे अपेक्षित आहे. या अनुषंगाने संबंधित विभागांच्या सहमतीने स्वतंत्र आदेश त्या त्या विभागाकडून निर्गमित करण्यात येतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१७१२०८३९४५२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay M Bhandarkar

Digitally signed by Sanjay M Bhandarkar
DN: CN = Sanjay M Bhandarkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.04.17 12:20:44 +05'30'

**(सं.मु.भांडारकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. सर्व विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानसभा.
५. सर्व विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानपरिषद.
६. मुख्य सचिव यांचे उपसचिव.
७. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
९. सर्व विभागीय आयुक्त.
१०. सर्व जिल्हाधिकारी.
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१३. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१४. महासंचालक, यशदा, पुणे.
१५. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१४.
१६. नियोजन विभाग, कार्यासन-१४४४.
१७. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागातील सर्व कार्यासने.
१८. निवड नस्ती, पर्यटन.

***